**विधानमंडळ कामकाज प्राथम्य**

**विधानमंडळ अधिवेशन कालावधीत मंत्रालयीन विभागांच्या सचिवांनी सभागृहाच्या गॅलरीत उपस्थित राहण्याबाबत व अधिवेशनासंबंधीत कामकाज विहित कालमर्यादेत पूर्ण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: विमंअ-२०१६/(३)/प्र.क्र.१७१ /पाच,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१६

**पहा :-**

शासन परिपत्रक - संसदीय कार्य विभाग, क्रमांक-विमंअ-२०१६/(३)/ प्र.क्र.१७०/पाच,
दिनांक १८ नोव्हेंबर, २०१६.

**शासन परिपत्रक**

महाराष्ट्र विधानमंडळाचे सन २०१६ चे हिवाळी अधिवेशन, विधानभवन, नागपूर येथे सोमवार, दिनांक ५ डिसेंबर, २०१६ पासून अभिनिमंत्रित करण्यात आले आहे. प्रस्तुत अधिवेशनासंदर्भातील कामकाज प्राथम्यक्रमाने हाताळण्याबाबतच्या सूचना प्रधान सचिव, संसदीय कार्य विभाग यांनी संदर्भाधिन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. विधानमंडळाच्या उभय सभागृहांच्या कामकाजामध्ये कोणत्याही बाबींच्या अनुषंगाने कोणत्याही विभागाचा मुद्दा केव्हाही उपस्थित होऊ शकतो व संबंधित मुद्यांबाबतची कार्यवाही तातडीने होण्यासाठी **विभागांच्या सचिवांची उपस्थिती** नागपूर येथे, तसेच, आवश्यकता असेल, त्यावेळेस विधानमंडळाच्या सभागृहाच्या गॅलरीत देखील **अनिवार्य** आहे आणि विधानमंडळ अधिवेशन काळात सभागृहात ज्या दिवशी त्यांच्या विभागांशी संबंधीत महत्त्वाचे प्रश्न, लक्षवेधी सूचना, अर्धा तास चर्चा, अर्थसंकल्पीय मागण्यांवरील चर्चा व मतदान आणि इतर महत्त्वाचे कामकाज असेल, त्या दिवशी त्यांनी सभागृहातील अधिकारी गॅलरीमध्ये उपस्थित रहावे व अन्य सभागृहात निकटतम वरिष्ठ अधिकाऱ्यास उपस्थित ठेवावे. तसेच, सभागृहातील चर्चेमध्ये उपस्थित होणाऱ्या मुद्यांबाबतची माहिती त्यांच्या मा. मंत्री / राज्यमंत्री महोदयांना **तात्काळ** उपलब्ध केली जाईल, याबाबत त्यांनी दक्षता घ्यावी.

२. यास्तव, सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांनी अधिवेशनाच्या कालावधीत नागपूर येथे उपस्थित रहावे. परंतु काही अनिवार्य कारणांमुळे, त्यांना नागपूरबाहेर दौऱ्यावर जाणे भाग पडल्यास, त्यापूर्वी त्यांनी माझी व त्यांच्या संबंधित मंत्र्यांची पूर्वानुमती घ्यावी व त्यांच्या अनुपस्थितीत विधानमंडळ कामकाज पार पाडण्यासाठी त्यांनी जबाबदार अधिकाऱ्याची नियुक्ती करावी.

३. विधानमंडळाच्या विधानसभा आणि विधानपरिषद सभागृहात तारांकित / अतारांकित प्रश्न, लक्षवेधी सूचना, महाराष्ट्र विधानपरिषद नियम ९३ अन्वयेच्या सूचना, स्थगन प्रस्ताव, औचित्याचे मुद्दे, विशेष उल्लेख इत्यादी संसदीय आयुधांच्या माध्यमातून उपस्थित करण्यात आलेल्या बाबींसंदर्भात शासनाकडून कार्यवाही करण्याचा कालावधी विधानसभा आणि विधानपरिषद नियमांद्वारे विहित करण्यात आलेला आहे. तथापि, अशाप्रकरणी शासनाकडून विहित कालावधीत कार्यवाही न झाल्यामुळे, सन्माननीय सदस्यांकडून नापसंती व्यक्त करण्यात येते आणि त्याअनुषंगाने मा. पीठासीन अधिकारी महोदय हे वेळोवेळी बैठका घेऊन अथवा पत्राद्वारे शासनाला सबंधीतांविरुद्ध कडक कार्यवाही करण्याबाबत निदेश देतात.

४. पूर्वोक्त परिच्छेदांत नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता, सन्माननीय सदस्यांकडून विविध आयुधांद्वारे उपस्थित करण्यात आलेल्या बाबींची उत्तरे परिपूर्ण आणि सर्वसमावेशक असतील, तसेच, सदर उत्तरे विहित मुदतीतच विधानमंडळ सचिवालय / संबंधीत सन्माननीय सदस्यांना पाठविली जातील, याची सर्व सचिवांनी कृपया व्यक्तीशः दक्षता घ्यावी. त्याअनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेऊन, त्याची माहिती दर आठवड्याच्या पहिल्या दिवशी मला अवगत करावी.

५. अशाप्रकारे, वरीलप्रमाणे विहित कालमर्यादा आखून दिलेली कोणतीही बाब प्रलंबित राहिल्यास, संबंधीत विभागाच्या सचिवांविरुद्ध कडक कारवाई करण्यात येईल.

उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१६११२२१२५५००५७१५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=All India Service, ou=Chief Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2016.11.22 17:13:20 +05'30'

**(स्वा. शि. क्षत्रिय)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मंत्रालयीन विभाग.
५. निवड नस्ती.